कोविड-१९ च्या तपासणीसाठी जिल्हा रुग्णालय, अहमदनगर येथे स्थापन करण्यात आलेल्या RT-PCR प्रयोगशाळेस कार्योत्तर मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः करोना-२०२०/प्र.क्र.१८७/आरोग्य ३अ**

गो.ते.रुग्णालय आवार, दहावा मजला, संकुल इमारत

मंत्रालय, मुंबई ४००००१

दिनांक : २ डिसेंबर, २०२०

**वाचा :-**

१) जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, अहमदनगर यांचे पत्र क्रमांक. जिरुअ/कोरोना/ RT-PCR /९३५४-५९/२०२०, दिनांक २१.०५.२०२०

२) जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, अहमदनगर यांचे पत्र क्रमांक.जिरुअ/लेखा/२ / RT-PCR /प्र.शा.मान्यता/२०६१७-१८/२०२०, दिनांक २९.१०.२०२०

**प्रस्तावना :-**

कोव्हीड-१९ संसर्गजन्य आजारावरील प्रयोगशाळा तपासणी चाचण्या त्वरित होणेसाठी व भविष्यकाळात बाधित रुग्णांची वाढती संख्या या बाबी लक्षात घेवून कोरोना आजाराची व्याप्ती पाहता स्वँब तपासणी अहवाल त्वरित प्राप्त होवून आजाराचे निदान होणेसाठी जिल्हाधिकारी, अहमदनगर यांचे मौखिक आदेशानुसार जिल्हा रुग्णालय, अहमदनगर येथे दिनांक २२.०५.२०२० पासून R.T.P.C.R प्रयोगशाळा कार्यान्वित करण्यात आली होती. जिल्हा रुग्णालय, अहमदनगर येथे कार्यान्वित झालेल्या R.T.P.C.R प्रयोगशाळेस कार्योत्तर मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

कोविड-१९ विषाणु आजाराचे रोग निदान करण्यासाठी जिल्हा रुग्णालय, अहमदनगर येथे कार्यान्वित करण्यात आलेल्या RT-PCR प्रयोगशाळेस जिल्हा वार्षिक योजने अंतर्गत निधीची उपलब्धता झालेली असून सदर प्रयोगगशाळा स्थापन करण्याकरीता रुपये ९० लक्ष इतका खर्च झाला आहे. तसेच RT-PCR प्रयोगशाळा कार्यान्वित करण्याकरीता आवश्यक ते तांत्रिक व अतांत्रिक मनुष्यबळ राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत कंत्राटी पध्दतीने उपलब्ध करुन घेण्यात आलेले आहे. सदर RT-PCR प्रयोगशाळेची चाचण्या करण्याची क्षमता ५६० प्रतिदीन आहे. त्यानुसार, कोविड-१९ च्या तपासणीसाठी जिल्हा रुग्णालय, अहमदनगर येथे स्थापन करण्यात आलेल्या RT-PCR प्रयोगशाळेस कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२९१८००३६५२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjeev Harishchandra Dhuri

Digitally signed by Sanjeev Harishchandra Dhuri
Date: 2020.12.02 13:40:02 +05'30'

**(सं.ह.धुरी)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १/ २, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

३. संचालक (१), आरोग्य सेवा, मुंबई.
४. संचालक (२), आरोग्य सेवा, पुणे
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक
६. जिल्हाधिकारी, अहमदनगर
७. जिल्हा शल्य चिकित्सक, अहमदनगर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
९. निवडनस्ती (आरोग्य-३ अ).